**ई-सहित्य प्रतिष्ठान**

**वर्ष – तिसरे, अंक – १७ वा,**

**२५ एप्रिल २०११**

## <u>संपादक</u>

सारंग भणगे (पुणे)

## <u>सह-संपादक</u>

सोनाली घाटपांडे (पुणे)

भारती सरमळकर (मुंबई)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)

शशिकांत रणवरे (मुंबई)



# कवितेच्या सविता

जीवंत होतील माझ्यामधली कवितांची प्रेते,
उजाड रानी फुलून येतील कवितांची शेते.

ग्रीष्मामध्ये भरून येईल कवितेचे आभाळ,
कवितेचा नि मळवट शोभे विधवेचेही भाळ.

अंधाराला फ़ोडील कविता तेजाचे खिंडार,
कुबेरासही देईल कविता रत्नांचे भंडार.

आत्म्यालाही स्फुरतील माझ्या वेदांच्या कविता,
ब्रह्मांडाला व्यापून उरतील कवितेच्या सविता.

- सारंग भणगे, पुणे.

# शापित कवितेच्या प्रसववेदना



मनपाताळातील गूढ अंधारात दडलेल्या
विखारी प्रतिभेला आव्हान देत,
भावनांचे तरंग धडका देतात
अन
माझी कविता शब्दांचे किनारे शोधते!

शब्दांचे विस्तव स्फुलिंगीत होतात,
धग शरीर जाळते मनातली ज्वालामुखी
वासना, विचार सौंदर्यावर बलात्कार करत
अनौरस शब्दांचे भांडार उघडते!

शैशवातील काळात
बघू नये ते बघीतलेले,
ऐकू नये ते ऐकलेले,
सारे
असंख्य प्रश्न विचारीत
मेंदूला भोवळ आणतात

मग
मुर्छित अवस्थेत
भावनांशी प्रतारणा
करत

**कविता शब्दरूप घेते!**

- विजयकुमार, मुंबई



# मौनाला फुटली वाणी!

एक ना स्फुरला शब्द..

एक ना ओळ सुचली..

हसले रडले ओठांनी..!

एक ना कविता रचली.

शब्दपाखरे भवताली,

सुर गुंफून भिरभिरली..

तार तार झंकारूनी..

कंपने कंपनात विरली..!!!

अनाहतसा नाद छेडूनी..

मौनाला फुटली वाणी! ..

अगम्य अशा बोलांची..

नकळत जुळली गाणी..!!!

हसले रडले ओठांनी...

नकळत जुळली गाणी..!!!

- स्वाती फ़डणीस, मुंबई

# ती मला म्हणाली

माझ्या ह्रदयातील वेदना...

जेव्हा तुझ्या शब्दातून भळभळू लागली,

तेव्हा खूप वाईट वाटलं....

वाटलं जी आपलं सर्वस्व,

तीच्या नशिबी आपण फ़क्त दुःखाचं देणार??

का नाही सुचत आपल्याला काही सुखद....आल्हाददायक....

अगदी प्रेमकाव्य नाही तर निदान

एखादं निसर्ग वर्णन वगैरे....

पण तीच्यापासून काहीच लपून रहात नाही...

ती अगदि मनापासून हसली

म्हणाली,

वेडा आहेस...

अरे वातीच्या आयुष्याचं सार्थक आहे,

ते ती तेवती असण्यातच....

जर वात म्हणाली की मला ज्योतीचे चटके बसतात...

तर मग.... जगात प्रकाश असेल का???



- योगेश तपस्वी, पुणे.

# समजू नको अशी
# पायाची ही दासी!

अरे अरे कवीराजा गर्व नको करु
अभिमानी बनून असा अढी नको धरु
तूच माझा प्राणसखा तूच माझा तारु
अविचारी बनूनीया दूर नको सारु

जीवनात मी आले तुझ्या अन
कवी लागले नावात तुझ्या
मग कविता आधी की कवी आधी
अशा खूळचटाच्या का रे नादी?

तूच लावलीस मला नादे
नव्हती लागली तूझ्या मागे
मग..नसेल माझ्यात रस
तर तूझा अहंकार घेऊन बस

पटत कसे नाही तुला समजाऊ किती
तोडू नको अशी ही जुळलेली नाती
कवी आणी कवितेचे नाते अंग-संग
जो माझ्यात दंग मीही त्याच्या संग

नाही मी एकपती की नाही पतीव्रता
माझ्यामागे आहे हजारोंचा जथा
नसेल तुला गरज तर खुशाल जा परत
मीही नाही बसणार विरहाने झूरत

आयुष्यात आले किती अन गेले किती
गणती त्यांची ठेवायची, माझी नाही नीती
नसेल मला बाजारभाव, मला नाही हाव
पण माझे भांडवल करून खाऊ नकोस भाव

असेन बाजारु, मला त्याची लाज नाही
आहेच मी विकाऊ, मला त्याची तमा नाही
पण समजू नको अशी पायाची ही दासी
जरी अडकली तूझ्या लेखणीच्या फासी

- सुरेश शिरोडकर, मुंबई

# शब्द शब्द चेतण्यासाठी

शब्द शब्द चेतण्यासाठी
ठिणगीसम पडावी कविता,
लेक सासरी जाताना थोडी
हुंदक्यातून अडावी कविता.

तीच्या गुलाबी ओठांवर,
एक नशीली सुचावी कविता,
सोबत तीची सुटली तरीही
सोबत ‘तीच’ असावी कविता.

उध्वस्त मनाच्या गाभा-यातून
अभंगासम गावी कविता,
शुष्क मनाचे बीज रुजाया
मल्हारासम यावी कविता.

नव्या नवेल्या जन्मावर
पहिली वहिली लिहावी कविता,
सरणावरच्या मरणावरही
शेवटचीच, एक हवी कविता.

थिजल्या हरल्या क्षणी पुन्हा
राखेतून उडावी कविता,
साथ सुटता शब्दांची मग
धुसमुसून रडावी कविता.

- रमेश ठोंबरे, औरंगाबाद

# गझल



गाळून मुक्तछंदा गझलेस 'ठोकले' मी!
गाठून काफ़ियांना दिन-रात रोखले मी!!

सारी हयात जाया मनमीत ओळखाया,
टाळून राजमार्गा, वळणास जोखले मी!

**ना मागचा शहाणा, पुढचा ठेचकाळे,**
**लाटांवरी तुफ़ानी अलवार झोकले मी!**

**आयुष्य हे जुगारी व्यसनात डुंबलेले,**
**निर्लज्ज-कोडगीशी रडण्यास सोकले मी!**

का 'भूमिती' अडावी, समजूनही 'प्रमेये',
शेरात एक एका मजलाच 'टोकले' मी!

- सुप्रिया जाधव, नाशिक

# ती



ती समीप माझ्या येते, निसटुन जाते
मी स्तब्ध, बावरी मलाच विसरुन जाते

ती देऊन जाते अर्थ नवे शब्दांना
जोजवते हृदयी सृजनाच्या स्वप्नांना
संध्यारंगांसह नभात मिसळुन जाते

तळहाती रेखुन अलगद हलकी रेषा
तनमनी जागवुन अनामिक भाषा
ती मोहरलेल्या क्षणांत हरवुन जाते

मी त्या रेषेवर लिहीते काहीबाही
ते मनासारखे कधीच उमटत नाही
ती सहजच त्या ओळींना सजवुन जाते

ती रसिक, साजिरी सखी कल्पना माझी,
ती कविता, आराधना, साधना माझी
निर्भेळ सुखाच्या राशी उधळुन जाते

- क्रांती सडेकर (नागपुर)

मराठी  रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास "नेटाक्षरी" जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाणतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फूर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरी लवकरच शतक गाठेल. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्ट मित्रांना फॉरवर्ड करून त्यांनाही या आनंदयात्रेत सहभागी करून घ्यावे ही विनंती.  असे करताना  netaksharee@gmail.com या आमच्या आयडीचा अंतर्भाव  कराल. मग नंतरचे अंक आम्ही त्यांना पाठवत राहू.  मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक  लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत  नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

ई -साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

विनोदी मासिक : ई-स्टाप,

ऑडियो ई नियतकालीक अल्बम: स्वरनेटाक्षरी

मुलां साठी : बालनेटाक्षरी

प्रसिद्ध झालेली ई-पुस्तके

टल्लीची शाळा

ग्रेव्हयार्ड लिटरेचर

तो आणि ती

देशी दारुचे दुकान-३ क्र

तो, मी आणि सिगरेट

लोकल गोष्टी

ऑथंब

सईची वही

मकरंदच्या त्रिवेण्या

चार क्षण

प्रियेचे अभंग

ई-शाळा

मोरया

मीरा अनुवाद

सावळ्या मुलीची गाणी

अहं ब्रह्मास्मी

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच

सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

esahitya@gmail.com

नेटाक्षरीचा हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व

सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

netaksharee@gmail.com

आता ई-साहित्यची आजवरची सर्व ई-प्रकाशने उपलब्ध

आहेत सी डी मध्ये फक्त ५०/- रुपयांत १११ ई-पुस्तके

**www.esahity.com**